महाराष्ट्र चित्रपटगृहे[विनियम] नियम, १९६६ च्या तरतुदीनुसार चित्रपटगृहाचा परवाना आणि बंद असलेली चित्रपटगृहे पाडण्याबाबत संबंधितांकडून होत असलेली कारवाई.

महाराष्ट्र शासन,

गृह विभाग,

परिपत्रक क्रमांक: सीसीआर १५९४/३६/विशेष शाखा-५

मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक २१ जून, १९९६.

## परिपत्रक

राज्यातील चित्रपटगृहांचे कामकाज विनियमित करण्यासाठी राज्य शासनाने महाराष्ट्र चित्रपटगृहे[विनियम] नियम, १९६६ पारीत केलेले आहे. या नियमातील तरतुदीनुसार संबंधितांना चित्रपटगृह चालविण्यासाठी परवाना प्राप्त करून घ्यावा लागतो आणि त्या परवान्यातील अटी आणि शर्ती तसेच उपरोक्त नियमातील तरतुदीप्रमाणे चित्रपटगृहाचे विनियोजन करावे लागते.

२. उपरोक्त नियमाच्या नियम-९४ मध्ये अशी तरतूद करण्यात आलेली आहे की, परवाना प्राधिकाऱ्यांच्या लेखी मंजूरीशिवाय सिनेमागृहात कोणत्याही प्रकारची वाढ किंवा बदल करण्यात येऊ नये, नियम-९५ मध्ये बदल करण्यासंबंधात द्यावयाच्या नोटीसी संबंधातील उल्लेख करण्यात आलेला आहे. उपरोक्त नियमावरून हे स्पष्ट होते की, सिनेमागृहाच्या बांधकामात कोणताही बदल करण्यापूर्वी परवाना प्राधिकाऱ्यांच्या लेखी मंजूरीची आवश्यकता आहे.

३. नगर विकास विभागाने महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम १५९ नुसार चित्रपटगृहासाठी आरक्षित केलेल्या किंवा अस्तित्वात असलेल्या सिनेमागृहाच्या जागा वाणिज्य किंवा निवासी वापरासाठी वापरण्यास परवानगी देण्यासंबंधात प्लानिंग ऑथॉरिटींना मंजुरी देण्याचे अधिकार दिलेले आहेत. या अधिकारानुसार १९९१ च्या जनगणनेनुसार ज्या शहरांची लोकसंख्या२.५ लाखापेक्षा कमी असेल अशा शहरांच्या बाबतीत विकास योजनेतील नकाशात सिनेमागृहासाठी आरक्षण असलेल्या जागा किंवा अस्तित्वात असलेल्या सिनेमागृहाच्या जागा, जमिनीच्या मालकांना जर अशा जागेचा xxx वापर वाणिज्य किंवा निवासी वापरासाठी करावयाचा असेल तर वर दर्शविल्याप्रमाणे परवानगी देण्याचे अधिकार आहेत.

४. वर उल्लेखिल्याप्रमाणे अस्तित्वात असलेल्या सिनेमागृहांना महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम, १९६६ च्या तरतुदीनुसार परवाना दिला जातो. त्यामुळे चित्रपटगृहांच्या जागेत वर दर्शविल्याप्रमाणे बदल करताना वर उल्लेखिलेल्या नियम-९४ अन्वये परवाना प्राधिकाऱ्याच्या लेखी मंजुरीची आवश्यकता आहे किंवा कसे असा प्रश्न उपस्थित करण्यात आला होता. जोपर्यंत महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम, १९६६ च्या तरतुदींच्या अन्वयार्थाचा प्रश्न आहे तोपर्यंत असे स्पष्ट करण्यात येते की, एखादे विहित परवाना असलेले चित्रपटगृह बंद झालेले असेल आणि त्याच्या मालकाने त्याला देण्यात आलेले "ना हरकत प्रमाणपत्र" रद्द करून घेण्यासाठी अर्ज केलेला असेल आणि ज्यावेळी सदर चित्रपटगृह महाराष्ट्र चित्रपटगृहे [विनियमन] नियम, १९६६ आणि मुंबई सिनेमाज् रेग्युलेशन ॲक्ट, १९५३ च्या तरतुदी बाहेरील कारणासाठी पाडावयाचे असेल त्यावेळी वर दर्शविलेल्या अटींची परिपूर्ती होत असेल तर उपरोक्त नियमाच्या नियम-९४ नुसार परवाना प्राधिकाऱ्याच्या लेखी मंजुरीची आवश्यकता लागणार नाही.

अ. ना. भोसले

[ अ. ना. भोसले ]

कार्यासन अधिकारी, गृह विभाग [विशेष], महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व पोलीस आयुक्त,

सर्व जिल्हादंडाधिकारी.